किंमत २४ रुपये
२८

मिळण्याचें ठिकाण : मे. ल. ना. गोडबोले, बुकसेलर्स, पुणे २

मुद्रक.
सुपर कार्टन्स्
स.नं ३९/१/१/१, वडगाव शेरी,
पुणे १४

प्रकाशक : एस. के. कौशिक
वरुण एंटरप्राइझेसं,
२९७ बुधवार पुणे २.

# ग्रंथवाचन

श्रीनवनाथभक्तिसार हा ग्रंथ अत्यंत श्रेष्ठ असून परमप्रासादिक आहे व साधकाला विधिपूर्वक वाचन केले असता दिव्य अनुभव देणारा असा आहे. हा ग्रंथ चाळीस अध्यायांचा आहे. याच्या ओंव्या ७६०० आहेत. याचा ग्रंथकर्ता धुंडिसुत 'मालुकवि' या नावाचा आहे. तो नरहरी वंशातील असून परमभक्त आहे. त्याचप्रमाणे हा ग्रंथ भक्तिरस व अद्भुतरसाने परिपूर्ण भरला आहे. हा ग्रंथ शके १७४१ प्रमाथी नाम संवत्सरांत ज्येष्ठ शुद्ध प्रतिपदेला लिहून पूर्ण झाला असा ग्रंथात उल्लेख आहे. श्रीमद्भागवताच्या अकराव्या स्कंधामध्ये नवनारायणांचे संवाद निमि राजाशी झाले आहेत. ते नवनारायण ऋषभदेवांच्या शंभर पुत्रांपैकी नऊजण भगवद्भक्त म्हणून प्रसिद्ध आहेत. भगवान द्वारकाधीशांच्या आज्ञेवरून कवी नारायणाने मच्छिंद्र हे नांव धारण केले, हरीने गोरक्ष, अंतरिक्षाने जालंधर, प्रबुद्धाने कानिफ, पिप्पलायनाने चरपट, आविर्होत्राने नागेश, द्रुमिलाने भरतनाथ, चमसाने रेवण व करभाजनाने गहिनी अशी नावे धारण केली व कलियुगात अवतार धारण केले. हा नवनाथांचा संप्रदाय मूळ श्रीदत्तात्रेय गुरूंच्यापासून प्रवृत्त झाला असून आजही या संप्रदायात दिव्य तेजस्वी लोकांची उज्ज्वल परंपरा दिसून येते. श्रीनवनाथभक्तिसार या ग्रंथात नवनाथांचे अद्भुत चरित्र वर्णिलेले आहे.

हा ग्रंथ दिव्य चरित्राने नटलेला आहे. या ग्रंथाच्या वाचनाने ऐहिक उत्कर्ष व पारलौकिक कल्याण खात्रीने होते असा भक्तांचा अनुभव आहे. पारायण व सप्ताहपद्धतीचे नियम खालीलप्रमाणे आहेत.

दिनशुद्धी पाहून ग्रंथारंभ करावा. पूर्वेकडे मुख करून ग्रंथवाचनासाठी आसनावर बसावे. चौरंगावर दत्ताची तसबीर ठेवावी व पोथीपण ठेवावी. गणपतीचे स्मरण करून देवांना व थोर मंडळींना नमस्कार करून ग्रंथाची व दत्तात्रेयांची पूजा करावी. नैवेद्यासाठी पेढे, दूध, खडिसाखर, शक्य झाल्यास वडे असावेत. वाचन पूर्ण होईपर्यंत समई अखंड ठेवावी. धूप, नीरांजन लावावे. प्रथम दिवशी

विडा-सुपारी, नारळ व दक्षिणा ठेवावी. शुचिर्भूत असावे. ब्रह्मचर्य पाळावे. अध्याय सुरू झाल्यापासून संपेपर्यंत आसनावरून उठू नये व कोणाशी बोलू नये. शक्यतो सोवळ्याने वाचन करावे. रात्री घोंगडीवर झोपावे. प्रतिदिनी वाचन झाल्यावर दत्ताची आरती करावी. सांगतेसाठी ब्राह्मण, सुवासिनीस भोजन घालावे. ज्यांना सप्ताह-वाचनास वेळ नसेल त्यांनी श्रावणासारख्या पवित्र महिन्यात संपूर्ण महिनाभर वाचन करावे. मात्र अध्याय संपूर्ण वाचावा. कांही दिवस दोन अध्याय वाचावे. वरील सप्ताह व महिन्याचे पारायण घरी वाचले तरी चालेल. परंतु ज्याला लवकर फळ मिळावे अशी इच्छा असेल त्यांनी गाणगापूर, नरसोबाची वाडी, औदुंबर, माहूर, गिरनार आदि दत्तस्थानांच्या ठिकाणीं वाचन करावे. ज्याला समग्र अध्याय वाचण्यास वेळ नसेल त्याने एक तरी ओवी वाचावी व नवनाथांची प्रार्थना करावी म्हणजे मनःकामना पूर्ण होते.

नवनाथ सांप्रदायिक लोकांची नऊ दिवसांत (नवरात्र) पारायण-वाचनपद्धती खालीलप्रमाणे :—

| | | | |
|---|---|---|---|
| दिवस १ ला | ६ अध्याय | दिवस ५ वा | ५ अध्याय |
| दिवस २ रा | ५ अध्याय | दिवस ६ वा | ५ अध्याय |
| दिवस ३ रा | ५ अध्याय | दिवस ७ वा | ४ अध्याय |
| दिवस ४ था | ५ अध्याय | दिवस ८ वा | ३ अध्याय |
| | | दिवस ९ वा | २ अध्याय |

**टीप :—**

पारण्याच्या दिवशी प्रसादासाठी विशेषतः वडे (भरड्याचे), अंबिल (ताक–जोंधळ्याची खीर) व घुगऱ्या (हरबऱ्याच्या) करतात. वरील माहिती नाथपंथीय लोकांकडून विचारून घेऊन दिली आहे.

॥ श्री ॥

**' नवनाथ भक्तिसार ' या ग्रंथाच्या प्रत्येक अध्यायाची फलश्रुती खालीलप्रमाणे आहे :—**

| | | |
|---|---|---|
| अध्याय | १ | समंधबाधा नाहीशी होते. |
| अध्याय | २ | अपार धनप्राप्ती व विजय होतो. |
| अध्याय | ३ | शत्रूंचा नाश होईल, मुष्टिविद्या प्राप्त होईल व घरात मारुतीचे वास्तव्य राहील. |
| अध्याय | ४ | कपटाची बंधनव्यथा सुटेल व शत्रूंचा पराभव होईल. |
| अध्याय | ५ | घरात भुताचा संचार असेल तर तो थांबेल व घरात भूतबाधा होणार नाही. |
| अध्याय | ६ | शत्रूला मोह होईल. त्याच्या मनातील कपट दूर होऊन तो मित्र होईल. |
| अध्याय | ७ | चौऱ्याऐंशी लक्ष योनीत जन्म येणार नाही. व्यथा जाईल व चिंता दूर होईल. |
| अध्याय | ८ | दूर देशी गेलेला मित्र परत येईल. चिंता, व्यथा दूर होईल. |
| अध्याय | ९ | चौदा विद्या प्राप्त होतील व चौसष्ट प्रकारच्या कला साधतील. |
| अध्याय | १० | स्त्रीदोष नाहीसे होतील. कपट जाईल व मुले जगतील. |
| अध्याय | ११ | अग्निपीडा होत नाही. गृहदोष जातील. |
| अध्याय | १२ | देवतांचा क्षोभ असेल तर जाईल व सर्व देवता अनुग्रह करतील. |
| अध्याय | १३ | स्त्रीहत्येचा दोष नाहीसा होईल व पूर्वजांचा उद्धार होईल. |
| अध्याय | १४ | कारागृहातून मुक्त होईल व निर्दोषपणे लोकात राहील. |
| अध्याय | १५ | घरातील भांडणे नाहीशी होतील व घरात शांतिसुख मिळेल. |
| अध्याय | १६ | दुष्ट स्वप्नांचा नाश होईल. |
| अध्याय | १७ | योगसिद्धी होऊन सन्मार्ग प्राप्त होईल. |
| अध्याय | १८ | ब्रह्महत्यादोष नाहीसा होईल व कुंभीपाक नरकातून पूर्वजांचा उद्धार होईल. |
| अध्याय | १९ | परमानंदकारक मोक्ष मिळेल. |

| | |
|---|---|
| अध्याय २० | वेड लागलेले नाहीसे होऊन प्रपंच सुंदरपणे करील ( वाचणारा ). |
| अध्याय २१ | गोहत्येचे पातक नाहीसे होऊन तपोलोकात जाता येते. |
| अध्याय २२ | विद्यासंपन्न मुलगा होईल व तो विद्वानांना मान्य होईल. |
| अध्याय २३ | घरामध्ये अखंडपणे सोने शिल्लक राहते. |
| अध्याय २४ | बालहत्यादोष नाहीसा होऊन मुले सुखी होतील. |
| अध्याय २५ | शाप बाधणार नाही. मनुष्यजन्म येईल आणि सुंदर स्त्री व पुत्र मिळेल. |
| अध्याय २६ | गोहत्येचा दोष जाऊन शत्रुतुल्य मुले होणार नाहीत. |
| अध्याय २७ | हरवलेली वस्तु व पूर्वीचा नाहीसा झालेला अधिकार परत मिळेल. |
| अध्याय २८ | गुणवान स्त्री मिळून लग्न होईल व स्त्री अखंड सेवा करील. |
| अध्याय २९ | क्षयरोग बरा होईल व तीन प्रकारचे ताप जातील. |
| अध्याय ३० | चोरांची दृष्टी नाहीशी होईल. |
| अध्याय ३१ | शाबरी मंत्रांचे कपटी प्रयोग आपणावर होणार नाहीत. |
| अध्याय ३२ | गंडांतर नाहीसे होईल व आयुष्य वाढेल. |
| अध्याय ३३ | धनुर्वात होणार नाही व झाला असेल तर बरा होईल. |
| अध्याय ३४ | सर्व कार्यसिद्धि होऊन यशस्वी होईल. |
| अध्याय ३५ | महासिद्धि मिळतील व बेचाळीस पुरुषांचा उद्धार होईल. |
| अध्याय ३६ | साप व विंचू यांचे विष उतरून मनुष्य बरा होईल. |
| अध्याय ३७ | दुःशीलपणा नाहीसा होऊन विद्या प्राप्त होईल. |
| अध्याय ३८ | हिवताप, नवज्वर व इतर ताप नाहीसे होतील. |
| अध्याय ३९ | युद्धात विजयप्राप्ती होईल. |
| अध्याय ४० | हा अध्याय परिसाप्रमाणे व कामधेनूप्रमाणे सर्व इच्छा पूर्ण करील. संपूर्ण नवनाथ-भक्तिसार वाचल्याचे पुण्य मिळेल. पुत्र, पौत्र, यश, धन, धान्य इत्यादि प्राप्त होईल. |



अ. १ ला – आपणा सर्वांना कलियुगांत अवतार घ्यावयाचे आहेत
असें लक्ष्मीकांतानें नवनारायणांस सांगितलें.



अ. २ रा- शंकर आणि दत्तात्रेय मच्छिंद्रनाथास आशीर्वाद देतात.



अ. २ रा, ४ था – मारुती आणि मच्छिंद्रनाथांची भेट, मच्छिंद्रनाथांचे अष्टभैरवांशी युद्ध.



अ. ४ था – मच्छिंद्रनाथावर देवीच्या दासी चाल करून आल्या.



अ. ५ वा – वेताळासह सर्व भूतसेना मच्छिंद्रनाथांस शरण आली.



अ. ६ वा – जगावर उपकार करण्याकरतां तूं मच्छिंद्रनाथास सहाय्य कर असे भगवान शंकरांनी भद्रकालीस सांगितले.



अ. ७ वा – मच्छिंद्रनाथांचे वीरभद्राबरोबर युद्ध.





अ. ८ वा – रामाचे देवळांत जाण्यास द्वारपाळानें मच्छिंद्रनाथास अटकाव केला, पाशुपत राजा मच्छिंद्रनाथांचे पाया पडला.



अ. ९ वा– मच्छिंद्रनाथांनी गोवाराच्या ढिगाऱ्यांतून गोरक्षनाथास बाहेर काढले;
वड्याच्या भिक्षेकरता गोरक्षनाथानें आपले बुबुळ काढून दिलें.



अ. १० वा – गोरखनाथ चिखलापासून पुतळा बनवितांना त्यांत प्राण उत्पन्न झाला; मच्छिंद्रनाथांनी गहिनीनाथास गंगाबाईचे ओटीत घातले.



अ. ११ वा – बृहद्रवा राजाच्या सोमयागाचे वेळीं यज्ञकुंडातून जालंदराचा जन्म झाला.



अ. १२ वा- जालंदरानें कानिफास हत्तीच्या कानांतून अलगद खाली घेतले.
कानिफास श्रीदत्त अनुग्रह.



अ. १३ वा– आधारावाचून गवताची मोळी घेऊन जाणाऱ्या जालंदरास पाहून मैनावतीस आश्चर्य वाटले. तिनें जालंदरनाथांसाठी फळें व मिठाई नेली.



अ. १४ वा – गोपीचंदाचे स्नान; जालंदरास खड्ड्यांत पुरून सर्व खड्डा



अ. १५ वा – हात पाय जमिनीला चिकटून बसलेला शिष्यवर्ग
मूर्छित होऊन मारुती जमिनीवर पडला.



अ. १६ वा – गोपीचंद राजानें कानिफास पालखींत बसवून राजवाड्यांत नेलें. गोरक्षनाथ व कानिफनाथांची भेट.



अ. १७ वा – कानिफनाथाच्या सांगण्यावरून उत्तम मुहूर्तावर गोपीचंदानी जालंदरनाथांना खड्ड्यांतून बाहेर काढले.



अ. १८ वा – बहिणीच्या प्रेताचा हात घेऊन गोपीचंद गौडबंगाल्यास गेला.
जालंदरनाथांनी चंपावतीला जिवंत केले.



अ. १९ वा – कलिंगावेश्या स्त्री राज्यांत जाण्यास निघते. मरणोन्मुख मारुतीची रामनामानें गोरक्षनाथापासून सुटका.



अ. २० वा – मारुती मैनाकिनीच्या मंचकावर बसला, गोरखनाथाचा स्त्रीवेषांत मैनाकिनीच्या दरबारांत प्रवेश व मृदंग वादन.



अ. २१ वा – गोरक्षनाथ मच्छिंद्रनाथ व मीननाथांना घेऊन
तीर्थयात्रेमाठी श्रीगज्याबांहेर पडले.



अ. २२ वा – गुरुंची परीक्षा पाहण्यासाठी गोरक्षनाथांनी मीननाथाला मारून मच्छिंद्रनाथांचें पुढें धरलें.



अ. २३ वा – मच्छिंद्रनाथांनी साधूसंतांची पूजा करून मोठी समाराधना घातली.



अ. २४ वा – अरण्यांत हरणामध्यें खेळत असलेल्या भर्तरीस बरोबर घेऊन; भाट जयसिंह व त्याची पत्नी रेणुका आपल्या गांवी गेले.



अ. २५ वा – मिथीला नगरच्या राजानें आपल्या कन्येचा विवाह शापानें गाढव झालेल्या सुरोचन गंधर्वाशी केला.



अ. २६ वा – सुरोचन गंधर्वास नेण्यास मातली विमान घेऊन आला.



अ. २७ वा – विक्रमाचे गळ्यांत हत्तीनें माळ घातली–भर्तरीचा पिंगलेबरोबर विवाह.



अ. २८ वा – पिंगला सती गेली.



अ. २९ वा – गोरखनाथानें लक्षावधी पिंगला निर्माण केल्या.



अ. ३० वा— शशांगर राजाचे अर्घ्यातून पुत्र निर्माण झाला,



अ. ३१ वा- चामुंडा चौरंगीनाथास फळे आणून देते.



अ. ३२ वा – राणी रेवतीनें भुयारातील मच्छिंद्रनाथास
बाहेर काढून त्याचे तुकडे तुकडे केले.



अ. ३३ वा – गोरक्षनाथांनी माणिकजवळ भिक्षा मागितली.



अ. ३४ वा – गोरखनाथानें वीरभद्रास जिवंत केलें.



अ. ३५ वा — मच्छिंद्रनाथांस घेऊन दत्तात्रेय रेवणसिद्धापाशी आले.
यमधर्म रेवणनाथांची पूजा करतात.



अ. ३६ वा - रेवणनाथांनी शंकरास सावध केलें. आस्तिक मुनीनें



अ. ३७ वा – नागनाथानें ग्रामभोजन घातलें. नागनाथानें दत्तात्रयास हात जोडून स्तुति केली.



अ. ३८ वा – नारदानें मुलगा ब्राह्मणाचे स्वाधीन करून त्याचें नांव चर्पटीनाथ ठेवण्यास सांगितलें.



अ. ३९ वा — चर्पटीनाथानें शंकरास आणि विष्णूस सावध करतो असें ब्रह्मदेवास सांगितलें.



अ. ४० वा – मच्छिंद्रनाथाचे नेतृत्वाखाली सोमयागाची सुरवात झाली.



अ. ४० आ– मच्छिंद्रनाथांचे नेतृत्वाखाली सोमयागाची सुरुवात झाली.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीपांडुरंगाय नमः ॥ श्रीकुलदेवतायै नमः ॥ श्रीमातापितृभ्यां नमः ॥ ॐ नमो जी हेरंबमूर्ती ॥ वक्रतुंडा गणाधिपती ॥ विद्यार्णवा[1] कळासंपत्ती[2] ॥ भक्तसंकट वारीं गजानन ॥ १ ॥ सदैव धवला श्वेतपद्मा ॥ विद्याभूषित कलासंपन्नधामा ॥ तुझ्या वंदितों पादपद्मा ॥ ग्रंथाक्षरां बोलवीं ॥ २ ॥ तूं निश्चळ निरंजन[3] निर्विकार ॥ परी भक्तरज्जुबंधनाधार[4] ॥ प्रेमें संभवोनि मूर्ति साकार ॥ आम्हां दासां मिरविसी ॥ ३ ॥ तरी वक्रतुंडा पाशांकुशधरा ॥ किंकिणीमंडिता[5] ग्रंथादरा[6] ॥ येऊनि स्वामी वदनसुंदरा ॥ मम रसनारस[7] सेवीं कां ॥ ४ ॥ अगा अर्थ–लिंग–प्रकरण–ऱ्हस्व– ॥ दीर्घ[8] शृंगार धारणा सुरस ॥ छंद ताल नवरसरस ॥ ग्रंथामाजी आदरीं कां ॥ ५ ॥ हे गणाधिपते गणराज ॥ मी अबुध[9] वर्णना आहे सहज ॥ परी कृपा करोनि सकळां भोज[10] ॥ विकळ आपदा[11] हरी आतां ॥ ६ ॥ हे मोरेश्वरा गणाधिपाति ॥ सर्वविषयाधीशमूर्ती ॥ मंगळारंभी मंगळाकृती ॥ आरंभीं स्तुती पार्थितों ॥ ७ ॥ तरी सरस्वती कळामांदुस[12] ॥ सवे घेऊनि वहनहंस ॥ या संतांगणीं[13] येऊनि सभेस ॥ विराजावें महाराजा ॥ ८ ॥ जी मंगलदायक वाग्भवानी ॥ चातुर्यसरिता[14] ब्रह्मनंदिनी[15] ॥ ती महाशक्ती हंसवाहिनी ॥ येऊनि घेई महाराजा ॥ ९ ॥ जीचेनि कृपें वांकुडें दृष्टी ॥ वाचस्पतीच्या[16] मिरवती कोटी ॥ ती माय तूं सवें गोरटी ॥ घेऊनि येईं महाराजा ॥ १० ॥ असो ऐसें पाचारणवचन ॥ ग्लानित[17] भावना सम्यक्[18] पाहून ॥ ग्रंथासनीं मूर्तिमंत येऊन ॥ वरालागीं ओपिजे ॥ ११ ॥ सकळसिद्धी पूर्णपणा ॥ पावोत ऐशा विनीतवचना ॥ वरद[19] मौळी[20] हस्तकंजना[21] ॥ स्पर्शोनि ज्ञान मिरविलें ॥ १२ ॥ म्हणे महाराजा कलोत्तमा[22] ॥ सिद्धी पावेल काव्यमहिमा ॥

---

१ ( चौदा ) विद्यांच्या सागरा. २ ( चौसष्ट ) कळांनीं संपन्न. ३ निर्मळ. ४ भक्तांना प्रेमपाशरूपी दोरांनीं बांधण्याला आधार. ५ घागऱ्यांनीं अलंकृत. ६ ग्रंथारंभीं. ७ माझ्या जिभेपासून निघणारा रस–काव्यमय ग्रंथ. ८ यांतील अर्थ, पुल्लिंगादि भेद, आरंभिलेलें प्रकरण, ऱ्हस्वदीर्घ इत्यादिकांचें मर्म. ९ बुद्धि नसलेला. १० कला-गौरव. ११ कलाहीनतेचें संकट. १२ कलांची पेटी. १३ साधूंच्या समुदायांत. १४ चातुर्याची नदी. १५ ब्रह्मदेवाची कन्या. १६ बृहस्पतीच्या. १७ दीनपणाची. १८ नीटपणें. १९ वरदायक. २० मस्तकावर. २१ हस्तकमल. २२ उत्तम कलांमध्यें पारंगत.

ऐसें बोलोनि सुशीलधामा || रसने[1] स्थापिली सरस्वती || १३ || यापरी नमितों श्रीगुरुराज || जो अज्ञानतमीं[2] सविता विराजे || जो मोक्षपदातें वरवूनि[3] काज[4] || साधकातें विराजवी || १४ || तो ज्ञानेश गुरु ज्ञानदिवटी || संजोगोनि[5] बैसला मम पृष्ठीं || लेखणी कवळोनि करसंपुटीं || ग्रंथालागीं आदरीतसे || १५ || वरदहस्तें स्पर्शोनि मौळी[6] || फेडिली सकळ अज्ञानकाजळी || यापरी तया बद्धांजुळीं || अनन्यभावें नमितों मी || १६ || जो नरहरिवंशीं विजयध्वज || धुंडिराज नाम तयाचें साजे || तोही पृष्ठीं बैसोनि सहज || ग्रंथालागीं आदरीतसे ||१७|| आतां नमूं ज्ञानशक्ती || जी सत्तामयी चिद्‌भगवती || अनन्यभावें चरणांवरती || भाळ तिचिये अर्पोनियां || १८ || यापरी नमितो श्रोते संत || कीं तुमच्या गृहींचा मी अतीत[7] || तरी ग्रंथांतरीं सुरस नितांत || प्रेमभरित दाटवा || १९ || अहो प्राज्ञिक संत श्रोतीं || प्रत्यक्ष तुम्ही महेशमूर्ती || तुम्हां वर्णावया अबुध शक्ती || मजमाजी केवीं मिरवेल || २० || परी धन्य तुम्ही भक्तिवाडें || स्वीकारितां बोल बोबडे || जड बाळा उभवोनि कोडें || जगामाजी मिरवितां || २१ || कीं पहा जैसें कांचमण्यास || सोमकांत नांव ठेविलें त्यास || तेणोंचि शब्दें लाज सोमास[8] || वरवूनि बुंदां ढाळीतसे || २२ || तेवीं तुमचा शरणागत || नरहरि माल्लू धुंडीसुत || तस्मात् महंत श्रोते संत || करा सरतें आपणांतरीं[9] || २३ || यापरी पूर्वीं कथासारामृत ग्रंथ || वदविला तुम्हीं श्रद्धायुक्त || आतांही ओपूनि[10] वरद हस्त || भक्तिसार वदवा हा || २४ || जे संत झाले जगद्विख्यात || तयांचें माहात्म्य वदविलें समस्त || परी सारसार[11] कथा त्यांत || उरल्या असती महाराज || २५ || जया संतांच्या पायीं रत || गुरुमूर्ती प्रतापवंत || की ज्यांनीं सांप्रदाय जगद्विख्यात || जगामाजी स्थापिले || २६ || तरी त्यांची सर्व कथा ग्रंथीं || स्वीकारावया अवधान द्यावें श्रोतीं || असो कलिप्रारंभीं रमापती || नव-

---

१ जिव्हेवर. २ अज्ञानाच्या अंधारांत. ३ सिद्धि करून. ४ कार्य. ५ पाजळून. ६ माथा. ७ अतिथि. ८ चंद्राला. ९ आपणांमध्यें. १० ठेवून. ११ सारभूत अशा.

नारायणां[1] पाचारी ॥ २७ ॥ उद्धवासी बैसवोनि सन्निध ॥ कनकासनीं यादववृंद ॥ तंव ते नवनारायण प्रसिद्ध ॥ प्रविष्ट झाले द्वारके ॥ २८ ॥ कवि प्रथम हरि दुसरा ॥ अंतरिक्ष तृतीय होय चतुर ॥ महाप्राज्ञिक प्रबुद्ध नर ॥ नारायण चतुर्थ तो ॥ २९ ॥ पंचम महाराज पिप्पलायन ॥ सहावा आविर्होत्र नारायण ॥ सातवा द्रुमिल आठवा चमस जाण ॥ करभाजन नववा तो ॥ ३० ॥ ऐसे नवनारायण महाराज ॥ द्वारकेंत पातले सहजासहज ॥ रमापतीचें पाचारणचोज[2] ॥ दृश्य झाले धवळारीं[3] ॥ ३१ ॥ हरीनें पाहतांचि नारायण ॥ सोडिता जाहला सिंहासन ॥ परम गौरविले आलिंगून ॥ कनकासनीं बैसविले ॥ ३२ ॥ सकलवैभवभूषणाकार ॥ मेळवोनि सकळ अर्चासंभार[4] ॥ सारिता झाला सपरिकर ॥ षोडशोपचारें पूजेसी ॥ ३३ ॥ हरिचा गौरव पाहोन ॥ बोलते झाले नारायण ॥ कवण अर्थीं पाचारण ॥ आम्हांसी केलें श्रीरंगा ॥ ३४ ॥ हरि म्हणे जो महाराजा ॥ कीं मनीं काम[5] वेधला माझ्या ॥ कलींत अवतार घेणें ओजा[6] ॥ तुम्हीं आम्हीं चलावें ॥ ३५ ॥ जैसे समुच्चयें[7] एकमेळीं ॥ राजहंस जाती उदधिजळीं[8] ॥ तेवीं तुम्हीं कृपाकल्लोळीं ॥ अवतारदीक्षा मिरवावी ॥ ३६ ॥ येरू म्हणती जनार्दना ॥ अवतार घ्यावा कवणे स्थाना ॥ कवण नामीं कवण लक्षणा ॥ जगामाजी मिरवावें ॥ ३७ ॥ यावरी बोले द्वारकाधीश ॥ कवि नारायण जो का प्रत्यक्ष ॥ तेणें मच्छिंद्र होऊनि दक्ष ॥ जगामाजी मिरवावें ॥ ३८ ॥ यावरी हरी जो महादक्ष ॥ तो तंव शिष्य होऊनी प्रत्यक्ष ॥ महाराज नामें तो गोरक्ष ॥ जगामाजी मिरविजे ॥ ३९ ॥ यापरी अंतरिक्ष नारायण नाम ॥ तो जालिंदर मिरविजे प्रकाम[9] ॥ तयाचा शिष्य भक्तिद्रुम ॥ प्रबुद्ध नामें कानिफा ॥ ४० ॥ यापरी पंचम पिप्पलायन प्रकाम ॥ मिरविजे जगीं चरपट नाम ॥ आविर्होत्र जो योगद्रुम[10] ॥ मिरविजे जगीं नामें नागेश ॥ ४१ ॥ यापरी द्रुमिल अतिसमर्थ ॥ जगीं मिरविजे भरतनाथ ॥ आणि चमस नारायण जगीं

---

१ नऊ योगीश्वरांना. २ निमंत्रणाचें कौतुक. ३ राजवाड्यांत. ४ पूजासाहित्य. ५ इच्छा. ६ उत्तम रीतीनें. ७ थव्यानें. ८ समुद्राच्या पाण्यावर. ९ यथेच्छ. १० योगरूपी वृक्ष.

विख्यात ॥ रेवणनामें मिरविजे ॥ ४२ ॥ नववा जो करभाजन ॥ तो गहिनी ऐसें मिरविजे नाम ॥ ऐसे अवतार महीकारण[1] ॥ दीक्षेप्रति मिरवावे ॥ ४३ ॥ म्हणाल एकटपणीं वास ॥ करणें सांगतां आम्हीं कलीस ॥ तरी तुम्हांसवें अवतारास ॥ बहुत येतील महाराजा ॥ ४४ ॥ प्रत्यक्ष कवि वाल्मीक सुरस ॥ तो पुढें होईल तुलसीदास ॥ आणि शुक महाराज जो ब्रह्मभास ॥ कबीर भक्त होईल तो ॥ ४५ ॥ यापरी जो व्यास मुनी ॥ तो जयदेव होईल महाप्राज्ञी ॥ आणि उद्धव माझा प्राणाहुनी ॥ आवडता होईल नामा[2] तो ॥ ४६ ॥ आणि भक्तिप्रौढी जांबुवंत ॥ तो नरहरि होईल नितांत ॥ प्रत्यक्ष जो बलराम भ्रात ॥ पुंडलीक होईल तो ॥ ४७ ॥ मीही प्रत्यक्ष जन्मोन ॥ ज्ञानदेव नामें मिरवीन ॥ आणि धवलांगी[3] जो पंचानन[4] ॥ निवृत्तिनाथ होईल कीं ॥ ४८ ॥ आणि सत्यनाथ[5] चतुरानन[6] ॥ तो स्वनामीं मिरवील सोपान ॥ जी योगमाया मानसमोहन ॥ मुक्ताबाई विराजेल ॥ ४९ ॥ यापरी प्राज्ञिक[7] हनुमंत ॥ तो रामदास होईल महाभक्त ॥ आणि कुब्जा दासी मातें रमत ॥ जनी जनांत होईल कीं ॥ ५० ॥ असो ऐसें समुच्चयेंकरोन ॥ कलींत वाढवावें भक्तिमाहात्म्य जाण ॥ भग अवश्य म्हणोनि नारायण ॥ पुढें बोलत प्रश्नातें ॥ ५१ ॥ म्हणती महाराजा सर्वज्ञमूर्ती ॥ आम्हां सांगतां जन्मस्थिती ॥ परी कवण स्थानीं केउतें[8] कीं ॥ व्यक्त होणें तें सांगा ॥ ५२ ॥ यावरी बोले प्रत्यक्ष नारायण ॥ कीं दीक्षेचें भविष्यपुराण ॥ पूर्वींच कथिलें पराशरनंदनें[9] ॥ महामुनि व्यास तो ॥ ५३ ॥ अगा पूर्वी अठ्यायंशीं सहस्र ऋषी ॥ निर्माण झाले विधिवीर्यासी ॥ तें वीर्य चुकोनि ठायाठायासी ॥ आपाप कांहीं उरलें असे ॥ ५४ ॥ तें जीवदशे-वांचोनि सत्य ॥ महाराजा न पावे उदय ॥ तरी ते ठायीं ठायीं केउतें वीर्य ॥ त्याचें ठाय ऐकावें ॥ ५५ ॥ उपरिचर[10] वसु यानीं[11] असतां ॥ वीर्य गळलें उर्वशी पाहतां ॥ तें शरस्तंबीं[12] दुरोनि द्रवतां ॥ आदळतां

१ पृथ्वीचा भार हरण्यासाठीं. २ नामदेव. ३ शुभ्र कांतीचा. ४ शंकर. ५ सत्यलोकाचा स्वामी ब्रह्मदेव. ६ चतुर्मुख ब्रह्मा. ७ महाबुद्धिमान. ८ कोणत्या. ९ पराशरपुत्र व्यासानें. १० नित्य विमानांतून संचार करणारा एक राजा. ११ वाहनांत, विमानांत. १२ दर्भाच्या झुडपावर.

झालें त्रिभाग ॥ ५६ ॥ यमुनेंत वीर्यबिंदु द्रोणाकांठीं ॥ पडतांचि झाले विभाग शेवटीं ॥ दोन भाग द्रोणापोटीं ॥ एक जळीं पडियेला ॥ ५७ ॥ असो पर्णद्रोणांत जो भाग पडिला ॥ तो तत्काळ द्रोणकूपीं जन्मला ॥ परी जळांत जो भाग पडिला ॥ तो ग्रासिला मत्स्यानें ॥ ५८ ॥ तरी तें मत्स्युदरीं वीर्य ॥ नारायण प्रत्यक्ष आहे ॥ परी जीवदशेविण गर्भवंशोदय ॥ होत नाहीं महाराजा ॥ ५९ ॥ तरी प्राज्ञिक कवि नारायण ॥ तेणें मत्स्युदरीं जन्म घेणें ॥ मच्छिंद्र ऐसें जगांत नामानें ॥ मिरवावें महाराजा ॥ ६० ॥ यापरी शिव कामावरी[1] कोपोन ॥ तृतीयनेत्रींचा काढोनि अग्न ॥ महास्मर[2] केला भस्म तेणें ॥ ऐसें ग्रंथ बोलती ॥ ६१ ॥ परी तो काम द्विमूर्धनी[3] ॥ बैसला आहे वीर्य प्राशन करोनी ॥ तरी तयाचे जठरीं अंतरिक्ष जाऊनी ॥ जालिंदर नामें मिरवेल ॥ ६२ ॥ यापरी कुरुवंशीं जनमेजयें ॥ नागसत्री[4] आवाहन केलें आहे ॥ तया वंशीं महान पाहें ॥ बृहद्रथ राणा मिरवेल ॥ ६३ ॥ तो महीलागीं करील हवन ॥ तेव्हां गर्भ सांडील द्विमूर्धन ॥ यज्ञकुंडीं देदीप्यमान ॥ जालिंदरें जन्मावें ॥ ६४ ॥ यापरी ब्रह्मवीर्य सहस्रेंशीं ॥ ऋषि निर्मिले सहस्र अठ्यायशीं ॥ तेव्हां वीर्य रेवातीरासी[5] ॥ रेवेमाजी[6] पडियेलें ॥ ६५ ॥ तें महीचे परम कुशीं ॥ वीर्य आहे रेवातीरासी ॥ तेथें व्यापोनि जीवदशेसी ॥ देहालागीं मिरवावें ॥ ६६ ॥ तो महाराजा चमस नारायण ॥ रेवणसिद्ध मिरविजे नामानें ॥ रेवारेवेंत[7] झाला जन्म ॥ म्हणोनि नाम हें त्याचें ॥ ६७ ॥ तेचि वेळीं आणिक रेत ॥ सर्पिणीमौळीं[8] अकस्मात ॥ पडतां प्राशिलें तिनें नेमस्त ॥ भक्ष्य म्हणोनि जाण पां ॥ ६८ ॥ ते जनमेजयाचे नागसत्रांत ॥ नाग आहुति विप्र देत ॥ तये वेळीं आस्तिकें निश्चित ॥ सर्पिणीतें लपविलें ॥ ६९ ॥ ब्रह्मवीर्य उदरांत ॥ अंडजाशुक्तिरत्नयुक्त[9] ॥ पुढें होईल महा-

---

१ मदनावर. २ मदन. ३ अग्नी. ४ सर्पसत्रांत. ५ नर्मदेच्या काठीं. ६ रेतींत. ७ नर्मदेच्या रेतींत. ८ सर्पिणीच्या मस्तकावर. ९ नागिणी हीच जणूं शुक्ती म्हणजे शिंपला, त्यांतील मोती.

नाथ ॥ भविष्य जाणोनि आच्छादी ॥ ७० ॥ महातरूच्या पोखरीं[1] ॥ तक्षकात्मजा[2] पद्मिनी नारी ॥ ठेवितां प्राज्ञिक ऋषीश्वरी ॥ नवमास लोटले ॥ ७१ ॥ असो त्या अंडजाशुक्तिकायुक्त ॥ जीवदशा सकळ होऊनि मुक्त ॥ तरी आविर्होत्र नारायण तेथ ॥ संचरिजे महाराजा ॥ ७२ ॥ वीर्य अंडजपात्र सांडोनी ॥ गेली आहे तक्षकनंदिनी[2] ॥ तो वडाच्या पोखरस्थानीं ॥ अद्यापि आहे महाराजा ॥ ७३ ॥ तरी तेथें आविर्होत्र ॥ प्रवेश करितां सत्पात्र ॥ वटासिद्धनाथ स्वतंत्र ॥ तया देहीं मिरवावें ॥ ७४ ॥ यापरी मित्ररेत[3] मंत्रसंपत्तीं ॥ कृपें कुरवाळील मच्छिंद्रजती ॥ ती वरदहस्ताची उकरडा विभूती ॥ साचोकार मिरवेल ॥ ७५ ॥ तें मंत्रप्रतापें सूर्यवीर्य ॥ सविताराज सांडिता होय ॥ परी तें भविष्यकारणीं उकरडामय ॥ वरदभस्म मिरवेल ॥ ७६ ॥ तेथें हरी जो नारायण ॥ शीघ्र संचरोनि दीक्षाकारण ॥ गोरक्ष ऐसें प्रतिष्ठानामानें ॥ जगामाजी मिरवावें ॥ ७७ ॥ यापरी मृडानीकारणीं[4] ॥ सुरवर[5] आलिया दक्षसदनीं ॥ ते कमलोद्भव[6] पाकशासनी[7] ॥ समारंभें पातले ॥ ७८ ॥ परी दक्षात्मजेची[8] रूपहाटी ॥ नेत्रकटाक्ष पाहतां परमेष्ठी ॥ तेणें घडाडोनि कामपाठीं ॥ इंद्रियद्वारा द्रवला तो ॥ ७९ ॥ परी तो चतुराननी ॥ बैसला होता सभास्थानीं ॥ काम द्रवतां इंद्रियवदनीं ॥ परम चित्तीं लाजला तो ॥ ८० ॥ मग रगडोनि चरणटांचे ॥ छिन्नत्व केलें रेताचें ॥ तें एक आगळे साठ सहस्रांचें ॥ रेतभाग वहियेलें ॥ ८१ ॥ तें साठ सहस्र रेतप्रमाणासी ॥ जीवदशा अपत्य वालखिल्यऋषींसी ॥ झाले परी एक भागासी ॥ वीर्य आहे तैसेंच ॥ ८२ ॥ तें लज्जायुक्त होऊनी ॥ केरासह सांडिलें भागीरथीजीवनीं ॥ तयांतूनि एक भाग जाऊनी ॥ कुशबेटीं[9] स्थिरावला ॥ ८३ ॥ तरी ते कुशदर्भाचे निखळीं ॥ रेतभागाची आहे वेली ॥ ती पिप्पलायन माउली ॥ संचारावें तेणें तेथें ॥ ८४ ॥ टांचे चरपटलें आहे रेत ॥ म्हणोनि नाम चरपटनाथ ॥ जगांत

---

१. ढोलीत. २ तक्षकाची कन्या. ३ सूर्याचे वीर्य. ४ पार्वतीकरितां ५ श्रेष्ठ देव. ६ कमलामधून उत्पन्न झालेला ब्रह्मदेव. ७ इंद्र. ८ दक्षकन्या पार्वतीची. ९ दर्भाच्या बेटामध्यें.

मिरवोनि जगविख्यात ॥ दीक्षेलागीं विराजावा ॥ ८५ ॥ यापरी कुंभोद्भवाचा उदय झाला ॥ तो मित्रकामशराचा लोट लोटला ॥ तो गगनपंथें विमुक्त झाला ॥ अतिबळें करोनियां ॥ ८६ ॥ एक भाग घटीं पडतां ॥ अगस्तिउदय झाला तत्त्वतां ॥ एक भाग महीवरता ॥ कौलिकसदनीं पातला ॥ ८७ ॥ तो महाराज कौलिकऋषी ॥ भिक्षाभरतरी ऊर्ध्वंशी ॥ भरतरी म्हणती भिक्षापात्रासी ॥ आंगणीं तें ठेविलें ॥ ८८ ॥ तों मित्ररेत अकस्मात ॥ येऊनि पडिलें भरतरीआंत ॥ तें कौलिकें पाहोनि भविष्यातें ॥ भरतरीं तैसें रक्षितसे ॥ ८९ ॥ तरी ते भरतरींरेतसंगीं ॥ द्रुमिल नारायण प्रसंगीं ॥ संचारोनि रेत अंगीं ॥ भरतरी नामें मिरविजे ॥ ९० ॥ यापरी हिमाद्रीच्या विपिनस्थानीं[1] ॥ दिग्गज ठेला महीतें[2] शयनीं ॥ तैं सरस्वतीचे उद्देशेंकरोनी ॥ विधि[3] वीर्यासी ढांसळला ॥ ९१ ॥ तें वीर्य गजकर्णांत[4] ॥ पडतांचि झाले बिंदुयुक्त ॥ तरी कांहींसें वीर्य होऊनि विभक्त ॥ महीवरती पडियेलें ॥ ९२ ॥ तयावरोनि व्याघ्र चाली ॥ चालता भेदलें पाउलीं ॥ तया पादसंधींत तनु ओतिली ॥ जीवदशा अत्रींची ॥ ९३ ॥ तैसा गजकर्णसूतिकारण[5] ॥ प्रबुद्ध मिरविजे रेतरत्न ॥ तया नामाभिधानी प्रयत्न ॥ कर्णकानिफा मिरविजे ॥ ९४ ॥ यापरी गोरक्षाची हतवटी ॥ पडतां वाळवंटाचे पोटीं ॥ कर्दमपुतळा[6] करितां जेठी ॥ अभिमंत्रोनि भविष्यांतर ॥ ९५ ॥ मंत्रशक्तीं विष्णुवीर्य ॥ आव्हानिलिया पुतळामय ॥ तैं करभाजनें संचराया ॥ जीवदशा मिरवावी ॥ ९६ ॥ ऐसें सांगोनि रमारमणें[7] ॥ संतुष्ट केले नवनारायण ॥ मग परस्परें नमनानमन ॥ करोनियां उठले ते ॥ ९७ ॥ असो भगवंतेंशीं नवनारायण ॥ पाहती मंदराचळमौळीस्थान[8] ॥ श्रीशुकाचार्य समाधिपासीं जाऊन ॥ समाधीतें वरियेलें ॥ ९८ ॥ नव समाधी मेरुपाठारीं[9] ॥ दहावी समाधी शुकऋषीश्वरीं ॥ असो ते दाही स्थूळशरीरीं ॥ पुढें तेथोनियां निघाले ॥ ९९ ॥ यापरी

---

१ अरण्यांत. २ पृथ्वीवर. ३ ब्रह्मदेव. ४ हत्तीच्या कानांत. ५ हत्तीच्या कानांत जन्म पावण्यासाठीं. ६ मातीचा पुतळा. ७ विष्णूनें. ८ मंदर पर्वताचे शिखर. ९ मेरूच्या पठारावर.

शुक्राचार्यांचें कथन ॥ बद्रिकाश्रमीं सोमब्राह्मण ॥ रंभाउद्देशें झालें पतन ॥ कबीर तेथें जन्मला ॥ १०० ॥ ही कथा भक्तिकथामृतांत ॥ वर्णिली आहे जगन्नाथें ॥ आतां नवनारायण झालें व्यक्त ॥ त्यांची कथा ऐक वी ॥ १ ॥ असो वसुवीर्य दोन्ही भाग झाला ॥ एक मच्छीनें प्राशिला ॥ तंव कवि नारायण संचरोनि वाहिला ॥ गर्भ लागला वाढीसी ॥ २ ॥ दिवसानुदिवस नवमास ॥ मच्छीनें लोटिले जलोदरास ॥ पुढें प्रसूत अंडज सुरस ॥ यमुनाजळीं व्हावें जों ॥ ३ ॥ तों तेथें एक कथा वर्तली ॥ श्रीकैलासीं अपर्णा[1] माउली ॥ शिवासी म्हणे कृपासाउली ॥ अनुग्रह मज द्यावा जी ॥ ४ ॥ तुम्ही जपता जो मंत्र ॥ तो मज द्यावा जी पवित्र ॥ तेणेंकरोनि मी चिर[2] ॥ सनाथपणें[3] मिरवेन जी ॥ ५ ॥ शिव म्हणे उमे ऐक ॥ मी मंत्र उपदेशीन सकळिक ॥ परी एकांत ठाव अलोलिक[4] ॥ ऐसा जाण पाहिजे गे ॥ ६ ॥ अपर्णा म्हणे एकांतस्थान ॥ तरी महीवरी शोधूं आपण ॥ ऐसें ऐकतां दयाघन ॥ अवश्य तीतें म्हणतसे ॥ ७ ॥ मग सिद्ध करोनि नंदिकेश्वर ॥ हिंडतां स्थाने महीवर ॥ श्रमोनि वर्ततां उमाईश्वर[5] ॥ यमुनेतटीं येऊनि पोंचले ॥ ८ ॥ मग उतरोनि नंदिकेश्वरावरूनि तीं ॥ नंदी ठेवोनि तटावरती ॥ उभयतां उतरोनि यमुनेसरितीं ॥ जवळ कांठीं बैसलीं ॥ ९ ॥ तंव तो यमुनातटएकांत ॥ तेथें मनुष्यांची न मिळे जात ॥ ऐसें पाहोनि शुद्ध एकांत ॥ तें स्थान ईश्वरासी मानलें ॥ ११० ॥ परी तो मच्छोदरांत ॥ कवि नारायण नेणोनि त्यांत ॥ पार्वतीतें उपदेशित ॥ मंत्रसंजीवनीसी नाथ ॥ ११ ॥ तीतें तो मंत्र उपदेशितां ॥ मच्छी तेथें होती सत्यता ॥ तो उपदेशशब्द गर्भी तत्त्वतां ॥ मच्छिंद्रानें ऐकला ॥ १२ ॥ ऐकलेपरी ग्रहणचि झालें ॥ तेणेंकरूनि ज्ञान प्रगटलें ॥ मीतूंपण सर्व सरलें ॥ सर्वांचि ब्रह्म सनातन[6] ॥ १३ ॥ असो शिव पार्वतीतें पुसत ॥ कीं कैसें चोज[7] उपदेशांत ॥ तूतें सांपडेल खूण ते मातें ॥ बोलोनि दावीं अपर्णे तूं ॥ १४ ॥ ऐसें शिव तीस पुसतां ॥ तों

---

१ पार्वती. २ सतत, निरंतर. ३ सौभाग्यानें. ४ अपूर्व, आगळा. ५ शंकर. ६ शाश्वत. ७ अपूर्वाई.

आधींच मच्छेंद्र झाला बोलता ।। म्हणे महाराजा आदिनाथा ।। ब्रह्मबीज[1] मिरवेल ।। १५ ।। आतां किंबहुना चराचरा ।। असे स्वरूपीं वृत्ति साकार ।। नग[2] नोहे हेमचि[3] सार ।। आब्रह्मभुवनापासोनी ।। १६ ।। ऐसें शिव ऐकतां वचना ।। जळीं पाहे चाकाटोन[4] ।। तों मच्छोदरीं नारायण ।। कवि महाराज समजला ।। १७ ।। मग शंकर बोलते झाले त्यातें ।। म्हणती महाराज तूं आहेस येथें ।। तरी मम उपदेशाचा तूतें ।। लाभ झाला कविराया ।। १८ ।। परी हें फारचि झालें अपूर्व ।। पुढें ऐक आनंदपर्व[5] ।। मंत्रउपदेशगौरव ।। दत्तमुखीं करवीन मी ।। १९ ।। तरी तुज जन्म झालियापाठीं ।। बद्रिकाश्रमीं यावें शेवटीं ।। तेथें तूतें देईन भेटी ।। सर्व सामग्री सचिन्ह ।। १२० ।। ऐसें बोलोनि आदिनाथ[6] ।। स्वस्थाना गेला अपर्णेसहित ।। येरीकडे गर्भ मच्छोदरांत ।। तोचि मंत्र घोकीतसे ।। २१ ।। यापरी भरतां पूर्ण दिवस ।। मच्छीनें प्रसूतकळा समयास ।। अंड सांडोनि जळतटास ।। मच्छी गेली जळोदरीं ।। २२ ।। असो अंड सांडोनि तीरास ।। मच्छी गेली जळोदरास ।। त्यास कांहीं लोटल्या दिवस ।। यमुनातीरींमहाराजा ।। २३ ।। तंव तेथें समयकाळीं ।। बकपक्ष्यांची उतरली मंडळी[7] ।। मीन[7] वेंचावया यमुनाजळीं ।। निजगणासहित संचरले ।। २४ ।। तो अकस्मात मित्रात्मजातटीं[8] ।। अंडजशुक्तिका पाहिली दृष्टीं ।। मग सर्व मिळोनि चंचुपुटीं[9] ।। खाद्य म्हणोनि भेदिती ते ।। २५ ।। चंचुपुटांचा भेदवज्र[10] ।। तेणें अंड झालें जर्जर ।। द्विशकल[11] होऊनि सत्वर ।। महीवरी आदळलें ।। २६ ।। परी वरील शकल पडिलें महीं ।। खालील शकलांत बाळ विदेही ।। जैसा अर्क[12] उदकप्रवाहीं ।। एकाएकीं उतरला ।। २७ ।। रुदनशब्द कडकडाट ।। बाळतेजाचा बोभाट ।। तें न्याहाळितां चकचकाट ।। पाहोनिया पळाले ते ।। २८ ।। असो सकळशुक्तिका रत्नाकर ।। आंत मुक्त-मुक्तिकेचा भद्र मच्छेंद्र ।। असतां तमारिकन्यातीर[13] ।। पावला धीवर[14] त्या काळीं ।। २९ ।। तो धीवर

---

१ ब्रह्मसाक्षात्कार. २ अलंकार. ३ सोनें. ४ आश्चर्यचकित होऊन. ५ आनंदाचा पर्वकाळ. ६ शंकर. ७ मासे. ८ यमुनेच्या तीरावर. ९ चोंचीनें. १० जोराचा घाव. ११ द्विखंड. १२ सूर्य. १३ यमुनातीर. १४ कोळी.

कामिकनाम सुभट ॥ पाहतां अंडजशुक्तिका प्रकट ॥ तों आंत रत्नतेज स्फुट ॥ बाळ रम्य देखिला ॥ १३० ॥ देखिला परी जो सविता[1] ॥ मग चित्तीं द्रवली मोहममता ॥ म्हणे बाळ हें कोमळ तत्त्वतां ॥ यातें भक्षील कोणी सावज ॥ ३१ ॥ ऐसा उदय होतां चित्तीं ॥ देव शब्दकुसुमां[2] सांडिती ॥ कीं हे महाराजा कामिकमूर्ती ॥ बाळ नेई वो सदनातें ॥ ३२ ॥ अरे हा कवि नारायण ॥ मच्छोदरीं पावला जनन ॥ तरी मच्छेंद्र ऐसें यातें नाम ॥ जगामाजी मिरवीं कीं ॥ ३३ ॥ अरे हा दक्ष योगींद्रजेठी ॥ तारक नौका महीपाठीं ॥ तरी तूं संशय सोडोनि पोटीं ॥ सदना नेईं महाराजा ॥ ३४ ॥ ऐसें देववागुत्तररत्न[3] ॥ कर्णपुटिकें[4] होतां भूषण ॥ मग तें दृढ करोनि जतन ॥ हृदयसंपुटीं पाळीतसे ॥ ३५ ॥ महाविश्वासाचे पाठीं ॥ आधींच मोह नांदेल पोटीं ॥ आनंदाची अपार दाटी ॥ आनंदपात्रीं हेलावे ॥ ३६ ॥ जैसें पयाचेनि[5] पात्रीं ॥ घृतशर्करा होय मिश्रिती ॥ तो गोडपणाचा भाग अमृतीं ॥ वाढला कां जाईना ॥ ३७ ॥ कीं दरिद्राचे सुखाडास[6] ॥ मनीं पेटली राजहंस ॥ ते गजशुंडींची माळा ग्रीवेस[7] ॥ सुख कां वाटलें जाईना ॥ ३८ ॥ कीं वंशवृद्धि ते शून्यमय ॥ चिंताकाळिमा निशा आहे ॥ तैसा सुतमित्राचा[8] होतां उदय ॥ मग तेथ चिंता कासया ॥ ३९ ॥ कीं कवडीसाठीं वेंचितां प्राण ॥ ते मांदूसचि[9] लाधली सुखधन ॥ कीं मृत्युभयातें असुख मानून ॥ चित्त जडे चिंतासाकडीं ॥ १४० ॥ तों पीयूषाची[10] अनुकूलता ॥ गोडी सुखाचा उदय होतां ॥ मग चिंतानिशीचा[11] आनंदसविता[12] ॥ प्रभेलागीं हेलावे ॥ ४१ ॥ मग स्नेहकवचें करसंपुटीं ॥ तोयें न्हाणिला बाळजेठी[13] ॥ हृदयीं वाहूनि कामिक पोटीं ॥ सदनीं आणिलें तयातें ॥ ४२ ॥ शारद्वता नामें सुंदर नारी ॥ ओपिता झाला तिचे करीं ॥ म्हणे साजणी वंशाधारी ॥ सुत मिरवीं लोकांत ॥ ४३ ॥ कीं पाहें पां पूर्ण भरंवसा ॥ कीं राधातनय कर्ण जैसा ॥ तरी तो पुढें राजमांदुसा[14] ॥ जगामाजी आव्हानी ॥ ४४ ॥ तन्न्यायें भाग्योदयें ॥ सर्व सुखशयनीं

---

१ सूर्य. २ शब्दरूपी फुलांना. ३ देववाणीरूपी रत्न. ४ कानांच्या पुड्यांना. ५ दुधाच्या. ६ सुकाळाला. ७ गळ्याला. ८. पुत्ररूपी सूर्याचा. ९ पेटी. १० अमृताची. ११ चिंतारूपी रात्रीचा. १२ आनंदरूपी सूर्य. १३ मुलांत श्रेष्ठ. १४ क्षात्रियांना.

पहुडावे ॥ अहाहा बाळ अवतार होय ॥ कवि नारायण मच्छेंद्र ॥ ४५ ॥ मग कामिकहातीं सुढाळ[1] सुता ॥ नवरत्नांच्या सम पाहतां ॥ परम आनंदली शारद्वता ॥ बाळ कवळिला स्नेहमेळीं ॥ ४६ ॥ स्नेहें धरितांचि पयोधरीं[2] ॥ पय दाटलें अतिपाझरीं ॥ जैसें सोमतेजकरीं[3] ॥ सोमकांत द्रवतसे ॥ ४७ ॥ असो कुशांचें मंडन ॥ स्नेहभावें होतां संगोपन ॥ मग बाळजठरपिंडींचा अग्न ॥ पय पाहोनि स्वीकारी ॥ ४८ ॥ तैं स्नेहाचा ओघ बाणे ॥ बाळ अंगिकारोनि मार्जनें ॥ तप्तोदकीं घालोनि स्नानें ॥ पालखातें[4] हालवितसे ॥ ४९ ॥ आधींच नामें शारद्वता ॥ त्यावरी अपत्यकामी कांता ॥ तेथें बाळमोहकाम द्रवतां ॥ कवण रीतीं वर्णावें ॥ १५० ॥ आधींच असतां अमरवेली[5] ॥ त्यावरी पर्जन्यवृष्टि झाली ॥ मग तो हेलावा लवलव पाउलीं ॥ कवणासी वर्णवे ॥ ५१ ॥ ऐसेपरी आनंदस्थितीं ॥ दिवस लोटले कांहींसे मिती ॥ पांच वरुषें वयावरुती ॥ मच्छिंद्रनाथ मिरवला ॥ ५२ ॥ तंव कोणे एके दिवसी ॥ सुदिनीं उदईक भूमीसी ॥ पिता म्हणे तमारिकन्येसीं[6] ॥ चला जाऊं ये मच्छिंद्रा ॥ ५३ ॥ अवश्य म्हणे मच्छिंद्रनाथ ॥ कृतांतभगिनीतीरा[6] येत ॥ मग जळोदरीं संचरोनि तात ॥ मच्छबाळां आव्हानीतसे[7] ॥ ५४ ॥ तंव जाळ्यासवें मीनधाडी ॥ आंतुल्या ओढी करसंपुटी ॥ बाहेर काढितां कामिक जेठी ॥ महीं मीनातें सोडीतसे ॥ ५५ ॥ मच्छिंद्रासी म्हणे सुतोत्तमा ॥ वेंचोनि सांठवी या मीनां ॥ ऐसे वदोनि कामिक पुन्हां ॥ जळामाजी संचरे ॥ ५६ ॥ येरीकडे मच्छिंद्रनाथ ॥ मीन देखतां म्हणे हो तात ॥ अहा मातुळकुळा घात ॥ कामिका ताता मांडिला ॥ ५७ ॥ तरी आपण असतां ऐसी रहाटी ॥ बरवेपणें पाहतां दृष्टी ॥ हें योग्य नव्हे कर्म पाठीं ॥ उपकारा मिरवावें ॥ ५८ ॥ पूर्वी आस्तिकें मातुळकुळा रक्षिलें ॥ आपुले तपाचेनि बळें ॥ राव बोधोनि सत्रपाळ ॥ नागकुळा वाचविलें ॥ ५९ ॥ मग एक एक मत्स्य वेंचोनी ॥ प्रवाहा मेळवी जीवनालागोनीं[8] ॥ तें कामिकतातें दृष्टीनें पाहोनी ॥ परम चित्तीं

---

१ तेजस्वी. २ स्तनांजवळ. ३ चंद्राच्या किरणांनीं. ४ पाळण्याला. ५ कल्पलता. ६ यमुनेला. ७ बोलावी. ८ पाण्यांत.

क्षोभला ॥ १६० ॥ जैसा परम सबळ ॥ पेटला मिरवी वडवानळ ॥ तेवीं कामिकक्रोधाग्नि प्रबळ ॥ हृदयामाजी धडाडी ॥ ६१ ॥ कीं मेघमंडळाचे दाटीं ॥ चपळा[1] पळती तेजावाटी ॥ तैसा धडाडोनि क्रोध पोटीं ॥ बाहेर आला तत्क्षणीं ॥ ६२ ॥ लक्षोनि मच्छिंद्राचें मुखमंडन ॥ स्वकरपुटीं[2] केले ताडन ॥ म्हणे जळोदरींचे काढितां मीन[3] ॥ बहु श्रम जाणसी ॥ ६३ ॥ तरी पुन्हां जळोदरी ॥ मच्छ सोडितोसी कैसा भिकारी ॥ खासील काय उदरांतरीं ॥ भीक मागों जाशील ॥ ६४ ॥ ऐसे ऐकोनि कामिकवचन ॥ मनांत मच्छिन्द्र करी बोलणें ॥ सर्वांत पवित्र भिक्षान्न ॥ दोष त्यासी कांहीं नसे ॥ ६५ ॥ तरी ह्याचे आतां उपदेश ॥ आरंभावे भिक्षान्नास ॥ येरीकडे जळोदरास ॥ कामिक तेव्हां संचरला ॥ ६६ ॥ येरीकडे मच्छिंद्रनाथ ॥ दृष्टी चुकवोनि गमन करीत ॥ भ्रमण करितां अद्वैतवनांत ॥ सुढाळ[4] जागा दिसेना ॥ ६७ ॥ मग उत्तरदिशा बद्रिकाश्रम ॥ पाहतां झाला योगद्रुम ॥ तेथें द्वादश वर्षें उत्तमोत्तम ॥ योगालागी आचरला ॥ ६८ ॥ तें तीव्र तप गा शुचिस्मंत ॥ मंत्रदृष्टी अद्वैतवनांत ॥ लोहकंटक पादांगुष्ठांत ॥ देऊनि तप करीतसे ॥ ६९ ॥ ऊर्ध्व वायूचे करूनि भक्षण ॥ दृष्टी अर्का[5] देऊनि दान ॥ वाचा करोनि कृष्णार्पण ॥ हरीभजनीं मिरविला ॥ १७० ॥ शरीर क्लेशा देऊनि दान ॥ ईश्वरी वेध तनुमनप्रमाणे ॥ तेणें अस्थिपंजरावरोन ॥ त्वचा तितुकी मिरवीतसे ॥ ७१ ॥ तपें भक्षिलें सकळ मांस ॥ परी लाग न लागे अस्थित्वचेस ॥ मांस भक्षोनि सकळ भागास ॥ वृद्धिरस सकळ आटिलें ॥ ७२ ॥ नेत्र फिरोनि झाल्या वाती ॥ दिसों लागली कार्पासरीती ॥ सकळ तेजाची आटली ज्योति ॥ महाघोर तपानें ॥ ७३ ॥ अस्थि त्वचा व्यक्त होऊनी ॥ शिरा दिसती चांगुलपणीं ॥ सर्व अंग गेले वाळोनि ॥ काष्ठापरी मिरवितसे ॥ ७४ ॥ ऐसे क्लेश असंभवित ॥ मच्छिंद्रअंगीं जाणवत ॥ तों तेथें अकस्मात ॥ अत्रिनंदन[6] पातला ॥ ७५ ॥ संचरोनि

---

१ विजा. २ आपल्या हातानें. ३ मासे. ४ उत्कृष्ट, तपश्चर्येला योग्य. ५ सूर्याला. ६ दत्तात्रेय.

देवालया ॥ स्तविता झाला उमाराया[1] ॥ हे दक्षजामाता करुणालया ॥ दिगंबरा आदिपुरुषा ॥ ७६ ॥ कामांतका फणिवेष्टका ॥ रुंडभूषणा[2] कैलासनायका ॥ अपर्णानिधाना कामांतका ॥ वृषभारोहणा महाराजा ॥ ७७ ॥ हे सकळ दानवांतका ॥ देवाधीशा उमाकांता ॥ प्रळयरुद्रा त्रिपुरांतका ॥ शूळपाणी महाराजा ॥ ७८ ॥ हे शंकरनामाभिधानी ॥ पंचवक्त्रा त्रिनयनी ॥ भस्मधारणा उमारमणी ॥ नरकपाळा विराजसी ॥ ७९ ॥ ऐसें स्तुतीचें वाग्रत्न ॥ दत्त अर्पितां माळा करोन ॥ तेणें तोषोनि कामदहन[3] ॥ प्रत्यक्षपणें मिरवला ॥ १८० ॥ प्रत्यक्ष होतां उमाकांत ॥ नयनीं याजिता झाला दत्त ॥ मग आलिंगोनि प्रेमभरित ॥ निकट आपण बैसला ॥ ८१ ॥ योगक्षेमाची सकळ वार्ता ॥ शिव पुसता झाला दत्ता ॥ तेणेंही सांगोनि क्षेमवार्ता ॥ शिवसुखा पुसिलें ॥ ८२ ॥ यापरी बोलता झाला दत्त ॥ कीं बद्रिकाश्रमीं कानन बहुत ॥ तरी महाराजा दृष्टी व्यक्त ॥ माजी करा कृपाळुवा ॥ ८३ ॥ मग अवश्य म्हणोनि उमारमण ॥ उभयतां पाहूं चालले कानन ॥ परी ही वासना दत्ताकारणें ॥ मच्छिंद्रदैवें उद्भवली ॥ ८४ ॥ जैसा लाभ असतो पदरीं ॥ तो सहज वळूनि येत घरीं ॥ लघुशंके मूत्रधारीं ॥ मांदुसघट[4] लागतसे ॥ ८५ ॥ कीं उष्णत्रासें मही चाली ॥ आतुडे[5] कल्पतरूची साउली ॥ तेवीं दत्तवासना उद्भवली ॥ मच्छिंद्रदैवप्रकरणीं ॥ ८६ ॥ कीं याजव्रता टाकिल्या बाहेरी ॥ हिरा ठेवोनि नेत गारी[6] ॥ तेवीं दत्तात्रेयवासनालहरी ॥ उदेली मच्छिंद्रदैवानें ॥ ८७ ॥ असो ऐशा लाभभावना ॥ उभयतां रमती बद्रिकाश्रमा ॥ नाना तरुप्लवंगमां[7] ॥ अपार चिन्हें पाहती ॥ ८८ ॥ सुरतरु[8] पोफळी ॥ बकुळ चंपक कर्दळी ॥ गुलछबु गुलाब केळी ॥ नारळी सोनकेळी शोभल्या ॥ ८९ ॥ की सहज पाषाण ढाळितां महीसी ॥ दैवें आतुडे हस्तपादांसी ॥ तेवीं मच्छिंद्रदैवउद्देशी ॥ दत्तवासना उद्भवली ॥ १९० ॥ ऐसे वर्णितां अपारतरु ॥ तरी बद्रिकेचा[9] फार शेजारू ॥ कानना महा निकट

---

१ शंकराला. २ रुंडमाळा धारण करणाऱ्या. ३ मदनाचें भस्म करणारा शंकर. ४ धनाचा घडा. ५ लाभे. ६ गारगोटी. ७ वृक्ष आणि पक्षी. ८ देवदारवृक्ष. ९ बोरीच्या झाडांचा.

मंदारू || मंदराचळ शोभला || ९१ || तयावरोनि वर्षत तोयधर[1] || मणिकर्णिके अपार नीर[2] || ती भागीरथी उत्तमतीर || निजदृष्टीनें पाहिली || ९२ || मग तेथ ओघ धरोन || उभयतां करिते झाले गमन || असो मार्च्छिद्राकारणें || निजदृष्टीं पाहावील || ९३ || तेथें जी जी होईल वार्ता || श्रीगुरु ज्ञानें होय सांगता || निमित्तमात्र धुंडीसुता || ग्रंथामाजी मिरावलें || ९४ || धुंडीसुत नरहरिवंशीं || माल्हू वदे कवित्वासी || निमित्तमात्र नरहरिकृपेसी || तोचि बोलवी ज्ञानेश || ९५ || स्वस्ति श्रीभक्तिकथासार || संमत गोरक्षकाव्य-किमयागार || सदा परिसोत भाविक चतुर || प्रथमोऽध्याय गोड हा || १९६ || श्रीकृष्णार्पणमस्तु ||

|| नवनाथभक्तिसार प्रथमोऽध्याय समाप्त ||

---

१ मेघ. २ पाणी.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी मूळपीठवासिनी[1] ॥ पुंडलीकाच्या गोंधळालागोनी ॥ भक्तवरदे भवानी ॥ उभी अससी माये तूं ॥ १ ॥ संत गोंधळी विचक्षण ॥ कंठीं मिरवितां तुळसीभूषण ॥ तेचि माळा सुलक्षण ॥ जगामाजी मिरविसी ॥ २ ॥ घालिती तुझा प्रेमगोंधळ ॥ कामक्रोधांचे देती बळ[2] ॥ गीतसंगीत सबळ ॥ गुण गाती माये तुझे ॥ ३ ॥ असो ऐसा गोंधळप्रकरणीं ॥ संतुष्ट होसी माय भवानी ॥ तरी या ग्रंथगोंधळीं[3] येऊनी ॥ साह्य करीं जननीये ॥ ४ ॥ मागिल्या अध्यायीं रसाळ कथन ॥ गणादि सकळांचे केलें नमन ॥ उपरी मच्छिंद्राचें जनन ॥ यथाविधी कथियेलें ॥ ५ ॥ आतां पुढें श्रवणार्थी ॥ बैसले आहेत महाश्रोती ॥ तयांची कामना भगवती ॥ पूर्ण करावया येईं कां ॥ ६ ॥ तरी श्रोतीं सिंहावलोकनीं कथन ॥ श्रीदत्तदेव आणि उमारमण ॥ भागीरथीविपिनाकारण ॥ पहात पहात चालिले ॥ ७ ॥ जैसे फळानिमित्त पक्षी ॥ फिरत राहती वृक्षोवृक्षीं ॥ त्याचि न्यायें उभयपक्षी ॥ गमन करिती तीरातें ॥ ८ ॥ सहज चालती विपिनवाटीं[4] ॥ तों मच्छिंद्र देखिला त्यांनीं दृष्टीं ॥ बाळतनू पाठपोटीं ॥ अस्थि त्वचा उरल्या पैं ॥ ९ ॥ जटा पिंगट नखें जळमट ॥ कंटकारी पादांगुष्ठ ॥ कार्पासमय[5] झाली दृष्ट ॥ त्वचा लिपटली अस्थींसी ॥ १० ॥ सर्वांगें शिरा टळटळाट[6] ॥ दिसती अवनीं[7] नामपाठ ॥ ध्वनिमात्र शब्द उठे ॥ चलनवलन नयनांचें ॥ ११ ॥ ऐसा पाहूनि तपोजेठी ॥ विस्मयो करिती आपुले पोटीं ॥ म्हणती ऐसा कलीपाठीं ॥ तपी नेणों कोणीच ॥ १२ ॥ अहो विश्वामित्रप्रकरणी ॥ दिसतो तपी हा मुगुटमणी ॥ तपार्थ कामना अंतःकरणीं ॥ करणी कोण यातें उदेली ॥१३॥ मग दत्तासि म्हणे आदिनाथ[8] ॥ मी स्थिरता[9] राहतों महीं येथ ॥ तुम्हीं जाऊनि कामनेतें ॥ विचारावें तयातें ॥ १४ ॥ कवणा अर्थी कैसा भाव ॥ उचंबळला कामार्णव[10] ॥ तरी लिप्सेचा[11] समूळ ठाव ॥

---

१ पांडुरंगरूपी रेणुका. २ बळी. ३ ग्रंथरचनारूपी गोंधळाला. ४ अरण्यांतील वाटेवर. ५ कापसासारखी. ६ टरारलेल्या. ७ पृथ्वीवर. ८ शंकर. ९ उभा. १० कामनेचा समुद्र. ११ इच्छेचा.

काय तोही पहात्रा || १५ || येऊनि त्यापरी अत्रिनंदन || शिवानंदसूक्तिक[1] सुढाळ[1] रत्न[1] || श्रवणपुटीं स्वीकारून || तयापासीं पातला || १६ || उभा राहोनि समोर दृष्टी || म्हणे महाराजा तपोजेठी || कवण कामना उदेली पोटीं || तें वरदवरातें मिरवावें || १७ || ऐसे वरदाचे वागवट[2] || मच्छिंद्र श्रवण करितां झगट || नम्रभाव धरूनि प्रकट || तयालागीं बोलत || १८ || कर्णीं शब्द पडतां सुखस्थिती || दृष्टी काढोनियां वरती || पाहता झाला दत्ताप्रती || महाराज योगी तो || १९ || भ्रूसंकेतें करोनि नमन || दाविता झाला निजनम्रपण || जो कीं ईश्वरी आराधन- || प्राप्तीलागी उदेला || २० || बोले महाराजा कृपासारिता || तुम्ही कोण तें सांगावें आतां || द्वादश वर्षें काननीं लोटतां || मानव नातळे दृष्टीसी || २१ || तरी त्वच्चित्त सदैव भवानी || प्रत्यक्ष झाली मम प्रारब्धें धरणीं || तरी प्रसादनग अभ्युत्थानीं || स्थापूनि जाईं महाराजा || २२ || ऐसें तयाचें वागुत्तर || ऐकोनि तोषला अनसूयाकुमर || म्हणे बा रे नामोच्चार || दत्त ऐसें मज म्हणती || २३ || जो व्याघ्रपदीं ऋषिजन्म || अत्रि ऐसें तया नाम || तयाचा सुत मी दासोत्तम || महीलागीं आधारलों || २४ || तरी असो ऐसी गोष्टी || कवण कामना तुझ्या पोटीं || उदेली जे तपोजेठी || शब्दसंपुटीं मिरवीं कां || २५ || येरू म्हणे वरदोस्तु || कामना वरी एक भगवंतु || ऐसें वदता झाला अतीतु || पदावरी लोटला || २६ || जैसी सासुऱ्या बाळा असतां || अवचट[3] दृष्टी पडे माता || हंबरडोनि धांवोनि येतां || ग्रीवे[4] मिठी घालीतसे || २७ || किंवा अवचट वत्सा भेटतां गाय || मग प्रेम लोटी चित्त सदैव || तेणेंपरी मच्छिंद्र मोहें || पदावरी लोटला तो || २८ || द्वादश वर्षें तपाचे श्रम || ते आजि फळले मानूनि उत्तम || सांडोनि सकळ आपुला नेम || पदावरी लोटला तो || २९ || परी तपश्रमाचे बहुत क्लेश || हृदयीं गहिंवरले दुःखलेश || नेत्रांचे झरे विशेष || पदावरी लोटले तैं || ३० || तेणें झालें पादक्षालन || पुढती बोले करी रुदन || हे महाराजा तूं भगवान || महीमाजी

---

१ शंकराचें आनंदमय बोलणें हेंच तेजस्वी रत्न. २ शब्द. ३ अकस्मात्. ४. गळ्याला.

मिराविशी ॥ ३१ ॥ रुद्र विष्णु विरिंची[1] सदय ॥ त्रिवर्गरूपी देह ऐक्यमय ॥ ऐसें असोनि सर्वमय ॥ साक्षी महीं अससी तूं ॥ ३२ ॥ तरी येऊनि सर्वज्ञमूर्ती ॥ असोनि माझा विसर चित्तीं ॥ पडलासे किमर्थ अर्थी ॥ अपराध गळीं सेवोनियां ॥ ३३ ॥ ऐसें म्हणोनि वारंवार ॥ ग्लानींत करी नमस्कार ॥ क्रेशनगींचें[2] चक्षुद्वार ॥ सरितालोट[3] लोटवी ॥ ३४ ॥ तरी तो अत्यंत शांत दाता ॥ म्हणे बा हे न करी चिंता ॥ प्रारब्धमंदराचळाची सरिता ॥ ओघ ओघील आतांचि ॥ ३५ ॥ मग वरदहस्तें स्पर्शोनि मौळी ॥ कर्णीं ओपीत मंत्रावळी ॥ तेणें अज्ञानदशाकाजळी ॥ फिटोनि गेली तत्काळ ॥ ३६ ॥ जैसें माहात्म्य भारती ॥ उदयदृष्टीं करितां गभस्तीं[4] ॥ मग अंधकाराची व्याप्ती ॥ फिटोनि जाय तत्काळ ॥ ३७ ॥ तेवी दत्त वरदघन[5] ॥ वोळतां गेलें सकळ अज्ञान ॥ मग चराचर सकळ जीवन ॥ जैसें हेलावलें दृष्टीसी ॥ ३८ ॥ नाठवे कांहीं दुजेपण ॥ झालें ऐक्य ब्रह्मसनातन ॥ जैसें उदधीं[6] सरिता-जीवन ॥ जीवना जीवनसम दिसे ॥ ३९ ॥ ऐसी झालिया जीवनसम दृष्टी ॥ आत्रेय धरिता झाला पोटीं ॥ म्हणे बा रे योगी धूर्जटी ॥ इंदिरावर कोठें तो सांग ॥ ४० ॥ येरू म्हणे जी ताता ॥ ईश्वरावांचोनि नसे वार्ता ॥ जळीं स्थळीं काष्ठीं महीं पर्वता ॥ ईश्वर नांदे सर्वस्वीं ॥ ४१ ॥ ऐसें ऐकोनि वागुत्तर ॥ ग्रीवा[7] तुकवी अत्रिकुमर ॥ मग सच्छिष्याचा धरोनि कर ॥ चालता झाला महाराज तो ॥ ४२ ॥ सहज चालतां चाले नेटीं ॥ आले आदिनाथ प्रेमदृष्टीं ॥ मच्छिंद्र मूर्धकमळघाटी ॥ पदावरी वाहातसे ॥ ४३ ॥ शिवें पाहूनि मंददेहीं ॥ म्हणे हा पूर्वी नारायण कवी ॥ मग प्रेमसरितेच्या लोटप्रवाहीं ॥ धारिला हृदयीं तत्काळ ॥ ४४ ॥ मग त्रिवर्ग येऊनि त्या स्थानीं ॥ दत्तासी म्हणे पंचमूर्धनी[8] ॥ या शिष्यातें अभ्यासोनी ॥ सकळ सिद्धी मिरवीं कां ॥ ४५ ॥ जें वेदकारणाचें निजसार ॥ जें सर्वोपकाराचें गुहागर ॥ सकळ सिद्धींचें अर्थमाहेर ॥ निवेदीं तूं महाराजा ॥ ४६ ॥ जारणमारण उच्चाटण ॥ शापादपि

---

१ ब्रह्मदेव २ क्लेशरूप पर्वताचें. ३ अश्रुरूपी नद्यांचे लोट. ४ सूर्य. ५ वररूपी उदक देणारा मेघ. ६ समुद्रांत. ७ मान. ८ शंकर.

निवारण || शरादपि अस्त्रादिनिबर्हणं[1] मंत्रशक्ती त्या वरत्या || ४७ || जो जैसा कर्मविजे पाठ || होती दैवतें वरती भेट || वंशवरद वाक्स्पट || मस्तकीं स्थापोनि जाताची || ४८ || वरुण आदित्य सोमस्वामी || भौमशक्रादि यमरश्मी || शिवशक्ति कामनरणी || वर देऊनि उठविले || ४९ || विष्णु विरिंची[2] कृपाकृती || वरदबीजे देऊनि शक्ति || ते मंत्रअस्त्रें अपारगती || हृदयामाजी हेलावला || ५० || असो सद्विद्येचा मंदराचळ || उभवोनियां अत्रिबाळ || क्षणमात्र वेंचूनि केला सबळ || सिद्धतरणी जेउता || ५१ || नागवकादि वातास्त्र || नगनागादि महावज्र || पावक[3] जलधी अस्त्र पवित्र || सांगोपांग तो झाला || ५२ || ऐसें सांगोनि सांगोपांग || जाता झाला योगमार्ग || परी सांप्रदाय योजूनि योग || कानफाडी मिरवला || ५३ || पुढील भविष्य जाणोन || सांप्रदाय केला निर्माण || षड्रूप जोगीदर्शन || कानफाडी मिरवले ||५४|| नाथ ऐसें देऊनि नाम || शिंगी शैली देऊनि भूषण || ऐसें परिकरोनि प्रमाण || अत्रिनंदन पैं गेला || ५५ || यापरी तो मच्छिंद्रनाथ || नमोनि निघाला आदिनाथ || महीवरी नाना तीर्थें || शोध करीत चालिला || ५६ || तो भ्रमण करितां सप्तशृंगीं || येता झाला महायोगी || अंबिका वंदोनि मनोमार्गी || सप्रेम स्थितीं गौरविली || ५७ || करीत वैखरीं अंबास्तवन || तों आलें कल्पने मन || कीं कांहीं तरी कवित्वसाधन || लोकांमाजी मिरवावें || ५८ || कवित्व तरी करावें ऐसें || कीं उपयोगीं पडे सर्व जगास || मग योजोनियां शाबरीविद्येस[4] || मनामाजी ठसविली || ५९ || यापरी अनेक कल्पना करीत || कीं शाबरीविद्येचें करावें कवित || परी वरदगुंतीं वश्य दैवत || केउते रीतीं होतील || ६० || मग अंबेपासी अनुष्ठान || करिता झाला सप्तदिन || वेदबीजाचें अभिषिंचन || अंबेलागी करीतसे || ६१ || तेणें जागृत महिषमर्दिनी || होऊनि बोले तयालागोनी || बा रे कवण कामना मनीं || वेधली तें मज सांग || ६२ || येरू म्हणे वो जगज्जननी || शाबरी विद्येचें कवित्व कामनीं || वेधक परी वरालागोनी ||

---

१ अस्त्रादिकांचें निवारण. २ ब्रह्मदेव. ३ अग्नि. ४ तांत्रिक गूढ विद्येला.

उपाय कांहीं मज सांग ॥ ६३ ॥ उपरी बोले चंडिका भवानी ॥ पूर्णता पावशी सकळ कामनीं ॥ मग त्या सिद्धाचा हात धरोनी ॥ मार्तंडपर्वतीं पैं नेला ॥ ६४ ॥ तेथें नागवृक्ष अचिंत्य थोर ॥ तरु नोहे तो सिद्धींचें आहेर ॥ दृश्यादृश्य केलें पर ॥ महातरु नांदतसे ॥ ६५ ॥ तेथें करोनि बीजीं[1] हवन ॥ तरु केला दृश्यमान ॥ तो कनकवर्ण देदीप्यमान ॥ निजदृष्टीं देखिला ॥ ६६ ॥ त्या तरूच्या शाखोपांतीं ॥ नाना दैवतें विराजती ॥ मग नामाभिधानें सकळ भगवती ॥ देवतांचीं सांगे त्या ॥ ६७ ॥ तीं दैवतें धुरंधर बावन्न वीर ॥ मूर्तिमंत असती तरूवर ॥ नरसी कालिका महिषासुर ॥ म्हंमदा झोटिंग वीरभद्र ॥ ६८ ॥ वेताळ मारुती अयोध्याधीश ॥ श्रीकोदंडपाणी[2] रामेश ॥ सूर्य नामीं तेथ द्वादश ॥ मूर्तिमंत नांदतसे ॥ ६९ ॥ पायरी जलदेवता असती नव ॥ कुमारी धनदा नंदा नांव ॥ त्रिमळा मंगळा ज्ञानप्राप्तिव ॥ लक्ष्मी आणि विख्याता ॥ ७० ॥ यापरी चंडा मामुंडा ॥ रंडा कुंडा महालंडा ॥ अप्सरा जोगिनी शंडवितंडा ॥ तरुभार्गीं विराजल्या ॥ ७१ ॥ काळव्याळ वीरभैरव ॥ भस्मकेत सिद्धभैरव ॥ रुद्र ईश्वरी गण भैरव ॥ अष्टभैरव हे असती ॥ ७२ ॥ यापरी शस्त्रअस्त्रयामिना ॥ दमि धूमि कुचित भामिना ॥ सातवी ज्वाळा शुभानना ॥ वृक्षावरी त्या असती ॥ ७३ ॥ यापरी शंखिनी डंखिणी यक्षिणी ॥ त्या समुच्चयें असती बारा जणी ॥ अष्टसिद्धी महाप्रकरणी ॥ वृक्षावरी विराजल्या ॥ ७४ ॥ प्राप्ति प्राकाम्या अणिमा गरिमा ॥ ईशित्व वशित्व प्रथिमा महिमा ॥ एवंच अष्टसिद्धी नामा ॥ तरूवरी विराजल्या ॥ ७५ ॥ अष्टसिद्धींसमवेत ॥ बावन्न वीर सकळ दैवत ॥ तया तरूच्या शाखा व्यक्त ॥ करोनियां बैसले ॥ ७६ ॥ ऐसे दृष्टीं पाहिले सर्वही ॥ तीं पहाती न बोलती कांहीं ॥ यावरी अंबिका करी काई ॥ निवे दोनी नाथातें ॥ ७७ ॥ बा रे ऋष्यमूकपर्वतस्थानीं ॥ ब्रह्मगिरीच्या निकटवासनीं ॥ अंजनपर्वत तयासी म्हणी ॥ नदी काचित् आहे बा ॥ ७८ ॥ दक्षिणओघीं सरिता जात ॥ ते कांठीं महाकाळी दैवत ॥ स्थानें असती

---

१ बीजमंत्राने. २ धनुष्य हातांत धारण केलेला.

जाण तेथ ॥ भगवतीतें नमावें ॥ ७९ ॥ तेथोनि पुढें दक्षिणपंथीं ॥ सरितापात्रें जावें निगुती ॥ परी बा तेथें श्वेतकुंडें असती ॥ तोयभरित[1] महाराजा ॥ ८० ॥ तरी शुक्लवेल[2] कवळूनि हातीं ॥ एक एक सोडावी कुंडाप्रती ॥ ऐशीं कुंडें एकशतीं ॥ हस्तिपदसमान[3] आहेत ॥ ८१ ॥ परी तितुकें पूजन कोरडे वेलीं ॥ सकळ सरल्या परत पाउलीं ॥ पाहात यावें ती वल्ली ॥ सकळ कुंडांमाझारी ॥ ८२ ॥ जया कुंडांत सजीव वेल ॥ दृष्टिगोचर बा होईल ॥ तया कुंडीं स्नान वहिलें[4] ॥ करोनि जीवन प्राशिजे ॥ ८३ ॥ तें जीवन[5] प्राशितां निश्चित ॥ मूर्च्छा येईल एक मुहूर्त[6] ॥ तै बारा नामीं जपावे आदित्य ॥ मूर्च्छे-माजीं असतां पै ॥ ८४ ॥ मग प्रत्यक्ष होईल तमांतक[7] ॥ मौळीं घ्यावा तो हस्तक ॥ पुढें काचकूपिका भरोनि उदक ॥ येथें यावें महाराजा ॥ ८५ ॥ मग बारा नामीं करोनि सिंचनीं ॥ तरु न्हाणावा तया जीवनीं ॥ तेव्हां दैवतें प्रसन्न होऊनी ॥ वरदान तूंतें देतील बा ॥ ८६ ॥ परी एक वेळां न घडे ऐसें । खेपा घालाव्या षण्मास ॥ एक एक दैवत एक खेपेस ॥ प्रसन्न होईल महाराजा ॥ ८७ ॥ ऐसें सांगोनि माय भगवती ॥ गेली आपुले स्थानाप्रती ॥ येरू पावला अंजनपर्वतीं ॥ सरितापात्री ओघातें ॥ ८८ ॥ काळी महाकाळी देवतांस ॥ नमोनि निघाला काननास ॥ करीं कवळोनि शुक्लवेलास ॥ कुंडांलागीं शोधीतसे ॥ ८९ ॥ असो एकशत कुंडें पाहोन ॥ तितुक्यांत शुक्लवेल स्थापोन ॥ पुन्हां पाहे परतोन ॥ सकळ कुंडांमाझारी ॥ ९० ॥ तों आदित्यनामें कुंडीं तीव्र ॥ ते वेल पाहे साचोकार ॥ तों दृष्टीं पडले पल्लवाकार ॥ स्नान तेथें सारिलें ॥ ९१ ॥ स्नान झालिया उदकपान ॥ होतांचि व्यापिलें अतिमूर्च्छेंनें ॥ परी द्वादश नामीं मंत्रसाधन ॥ सोडिलें नाहीं तयानें ॥ ९२ ॥ परी मूर्च्छा ओढवली अतितुंबळ ॥ शरीर झालें अतिविकळ ॥ स्वेद नेत्रें गेला अनिळ ॥ देह सांडोनि तयाचा ॥ ९३ ॥ ब्रह्मांडांतोनि अंतर्ज्योती[8] ॥ तीही वेंधों पाहे अंतीं ॥ तरी आदित्यनांवें[9] जाण होतीं ॥ जपालागीं नित्य करीत ॥ ९४ ॥ जसें जागृती

---

१ पाण्यानें भरलेला. २ पांढरी वेल. ३ हत्तीच्या पावलांएवढीं. ४ तत्काळ. ५ पाणी. ६ दोन घटिका. ७ सूर्य. ८ अंतःस्थ तेज. ९ सूर्याचीं नांवें.

घडोनि येत ॥ तोंचि स्वप्नीं जीव घोकीत ॥ त्याचि न्यायें उरला हेत ॥ जीव जपी अर्का[1] तो ॥ ९५ ॥ ऐसें संकट घडतां थोर ॥ खालीं उतरला प्रभाकर ॥ कृपें स्पर्शोनि नयनीं कर ॥ सावध केला महाराज ॥ ९६ ॥ मग कामनेचा पुरवोनि हेत ॥ मस्तकीं ठेविला वरदहस्त ॥ म्हणे बा रे योजिला अर्थ[2] ॥ सिद्धी पावसी येणें तूं ॥ ९७ ॥ ऐसें बोलोनि आदित्य गेला ॥ तेणें काचकुपिका[3] भरोनि वहिला ॥ पुन्हा मार्तंडपर्वतीं आला ॥ येऊनि नमी अश्वत्थ ॥ ९८ ॥ आदित्यनामें करोनि चिंतन ॥ आदित्य तेथें झाला प्रसन्न ॥ म्हणे महाराजा काय कामना ॥ निवेदावी मज आतां ॥ ९९ ॥ येरू म्हणे कवित्व करीन ॥ तया साह्य तुवां होऊन ॥ मंत्रविद्या तव नामानें ॥ फळास येवो महाराजा ॥ १०० ॥ अवश्य म्हणूनि तमभंजन[4] ॥ मंत्रविद्या साध्य करून ॥ बांधला गेला जलजलोचन[5] ॥ मंत्रशक्तिकार्यार्थ ॥ १ ॥ ऐसा सप्त मास येरझारा करून ॥ दैवतांसी करोनि घेतलें प्रसन्न ॥ मग शाबरीविद्येचा ग्रंथ निर्मून ॥ बंगाल देशीं चालता झाला ॥ २ ॥ असो ऐसी गोरक्षकथा ॥ वदला आहे किमयागारग्रंथा[6] ॥ तेथें किमयांचीं स्थानें सर्वथा ॥ सांगतलीं आहेत जीं ॥ ३ ॥ परी प्रथम अवघड करणें ॥ तें मानवातें न ये घडोन ॥ ते अवतारी असती परिपूर्ण ॥ म्हणोनी घडलें तयांसी ॥ ४ ॥ परी सांगावया कारण ॥ स्वमुखें गोरक्ष वदला आहे कथन ॥ त्या ग्रंथाचा आश्रय पाहून ॥ नवही योगी वर्णिले ग्रंथीं ॥ ५ ॥ तरी श्रोतीं तया ग्रंथा ॥ दोष न ठेवावा सर्वथा ॥ संशय आलिया किमयागारग्रंथा ॥ विलोकावें विचक्षणीं[7] ॥ ६ ॥ मुळावेगळें कांहीं कथन ॥ येत नाहीं जी घडोन ॥ म्हणोनि सकळ संशय सांडोन ॥ ग्रंथ श्रवणीं स्वीकारा ॥ ७ ॥ यापरी बळेंचि चाळवोनि दोष ॥ निंदोनि जो कां मोडील हरुष ॥ विकल्पपंथी[8] मिरवितां जगास ॥ पावेल वंशबुडी तो ॥ ८ ॥ आणिक वाणी जाईल झडोन ॥ नरकीं पडेल सप्त जन्म ॥ आणि जन्मोजन्मीं शरीरेंकरोन ॥ क्षयरोग भोगील तो ॥ ९ ॥ असो आतां तीर्थ-

---

१ सूर्याला. २ हेतु. ३ काचेची कुपी. ४ अंधकार नष्ट करणारा सूर्य. ५ कमलनेत्र. ६ 'गोरक्षकिमयागार' या नांवाचा ग्रंथ. ७ ज्ञानी लोकांनीं. ८ संशयमार्गी.

उद्देशीं || मार्च्छिद्र गेला बंगालदेशीं || तेथे फिरत तीर्थवासीं || हेळा[1] समुद्रीं पातला || ११० || तये देशीं चंद्रगिरि ग्राम || तेथें नरसिंहाचा झाला जन्म || सुराज्ञ पिता विप्रोत्तम || कृतिदेवीकुशीं झाला तो || ११ || असो तेथें जाऊनि नाथ || सहज भिक्षेसी हिंडतां गांवात || तों तेथें भविष्य उत्तरकथेंत || काय वर्तलें तें ऐका || १२ || तया गांवीं गौडब्राह्मण || सर्वोपदयाळ तया नाम || वसिष्ठगोत्री आचार-नेम || सकळ धर्म पाळी तो || १३ || आधीं तपन यजन[2] याजन || स्नानसंध्यामाजी निपुण || तयाची कांता गुणोत्तम || सरस्वती नामें मिरवतसे || १४ || सदा सुशील लावण्यखाणी || कीं नक्षत्रपातीं विराजे मांडणी || वाटे काम इच्छा धरूनि मनीं || तेथें येऊनि बैसला || १५ || कीं स्वर्गी मेघींचें मंडळ पाहीं || तेथोनि चपळा[3] उद्या ये ही || कीं अर्क होऊनि गृहीं गोसावी || तेजभिक्षा मागतसे || १६ जियेचे अधरपंवळदेठीं[4] || द्विज[5] विराजती वरती थाटीं || जैसें रत्न हेमीं[6] शेवटीं || स्वतेजें तगटीं || मिरवितसे || १७ || भाळ विशाळ सोगयांजन[7] || कुंकुमरसें शोभलें गहन || मुक्तानक्षत्रकवरीं संगीन || चंद्राभिजोरा विराजवी || १८ || नासिक सरळाकृती || ते शुक्तिकारत्नहेमगुप्ती || मुक्तनळे जैसे गभस्ती || नासिक-पात्रीं विराजले || १९ || कर्णबिंदीं वलयाकृती || हेममुगुटीं ढाळ देती || रत्नताटंके || नक्षत्रपातीं || करूं वश्य ती पातले || १२० || असो ऐसी शृंगारखाणी || सकळ संपत्ति नटली कामिनी || रूपवंती सकळ गुणीं || जगामाजीं मिरवतसे || २१ || परी उदरीं नाहीं संतान परम || तेणें उचंबळोनी योग-काम || न आवडे धंदा धामाश्रम || सदा वियोग बाळाचा || २२ || देवदेव्हारे उपाय अनेक || करिती झाली कामनादिक || परी अर्थ कोठें उदयदायक || स्वप्नामाजीं आतळेना || २३ || नावडे आसन वसन गात्र || विकळ मिरविती निराशगात्र || शून्यधामीं चित्त || पवित्र नांदणुकी नांदतसे || २४ || प्रपंच मानिती अतिहीन || जैसें दीपाविण शून्य सदन || कीं सकळ-

---

१. सहजगत्या. २ यज्ञ करणें. ३ वीज. ४ पोवळ्याप्रमाणें रक्त ओंठावर. ५ ओंठरूपी पोवळ्याच्या वेलाच्या देठावर दांत हेच पक्षी शोभतात. ६ सोन्याच्या कोंदणांत. ७ सुरम्याचें अंजन.

स्वरूपीं दाराहरण || परी नासिकहीन मिरवतसे || २५ || कीं वज्राउपरी गिरे गोमट || परी वसतीस दिसे तळपट || तेथें पाहतां दानवी पिष्ट || कांडिती ऐसें वाटे कीं || २६ || कीं तरुविण अरण्य कर्कश || कीं सरितांविण जैसें त्रिरस || मग तें क्षणैक पशुमात्रास || भयंकर दरी वाटतसे || २७ || कीं शरीरीं चांगुलपण || परिधानिलें वस्त्रानें भूषण || परि चतुःस्कंधीं शवदर्शन || सुगम कांहीं वाटेना || २८ || तें शरीर घ्राणाविण || आसन्नगांतें वाटे हीन || तेवीं सर्व उपचार कांतेलागोन || संसार हीन वाटतसे || २९ || ऐसें असतां भावस्थिती || गृही दर्शिली योगमूर्ती || नाथ मच्छिंद्र अंगणाप्रती || अलक्ष[1] सवाल वदतसे || १३० || तंव ते कांतेनें पाहूनि त्यातें || चरणीं लोटली शोकभरितें || आणोनि शीघ्र वस्त्र आसनातें || विराजविला महाराज || ३१ || आपण बैसोनि नाथानिकट || सांगती वियोग शोक उल्हाट || हृदयीं भरोनि नेत्रपाट || क्लेशांबु[2] मिरविले || ३२ || म्हणे महाराजा अनाथनाथा || तुम्ही सर्वगुणी विद्येसी जाणतां || तरी मम हृदयीं शोकसरिता || नाशजळा वाटतसे || ३३ || म्हणे तरी यातें उपाव कांहीं || सांगा म्हणोनि लागतें पायीं || पुन्हां स्पर्शोनि मौळी प्रवाहीं || कवण शब्दा वाढवीतसे || ३४ || पुढें ठेवोनि भिक्षान्न || पुन्हां कवळी मोहें चरण || आणि नेत्रां घनाची वृष्टि जीवन || पदमहीतें सिंचीतसे || ३५ || तेणें मच्छिंद्राचित्तसरिते || मोहसराटे अपार भरते || शब्दें तोयओघ[3] मिरवत || होतें सुखसरितेसी || ३६ || म्हणे वो साध्वी क्लेशवंत || किमर्थ कामनीं चित्त || तें मज वद कीं चित्तार्थ || सकळां मुक्ती लाहील कीं || ३७ || ऐसे शब्दवर्गउगमा || ऐकोनि बोले द्विजरामा[4] || म्हणे महाराज योगद्रुमा || संतती नाहीं वंशातें || ३८ || तेणें वियोगें खदिरांगार || झगट करितो अतितीव्र || तेणेंकरोनि चित्त शरीर || दाह दाये महाराजा || ३९ || ऐसे क्लेश चित्तशक्ती || कदा न वसे धैर्यपाठी || दुःख गोंधळी शोकपातीं || नृत्य करी कवळूनी

---

१ 'अलख' शब्द. २ दुःखाश्रूंचें पाणी. ३ पाण्याचा ओघ. ४ ब्राह्मणपत्नी.

